सिनियर ॲडव्होकेट सिध्दार्थ दवे "विशेष सरकारी अभियोक्ता/विशेष समुपदेशी" यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत....
गणेशपेठ पो.ठा. नागपूर शहर येथील गु.र.क्र.१०१/२००२ या दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणामधील कामकाजाकरीता.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-१११९/प्र.क्र.३३४/पोल-१०
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ मे, २०२५.

**संदर्भ:**१.पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१४/६६/१९६-वि.स.जोशी/गणेशपेठ/गुअवि. नागपूर/ ०१/२०२४, दि.२६.०६.२०२४
२.शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०१९/यू.ओ.आर.६२/डी-१४, दि.०३.०७. २०२४.
३.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
४.शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय :-**

गणेशपेठ पो.ठा. नागपूर शहर येथील गु.र.क्र.१०१/२००२ या दाखल गुन्ह्यातून उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणी शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी सिनियर ॲडव्होकेट सिध्दार्थ दवे यांची विधि व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन क्र.२ येथील शासन अधिसूचनेन्वये "विशेष सरकारी अभियोक्ता/विशेष समुपदेशी" म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी सिनियर ॲडव्होकेट सिध्दार्थ दवे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ, नागपूर येथील कामकाजाकरीता :-

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.१०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त)

उपरोक्त नमूद फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ सिनियर ॲडव्होकेट सिध्दार्थ दवे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फी चे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा.न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८)- २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

**४.** हा शासन निर्णय संदर्भ क्र. ३ व ४ मधील वित्त विभाग, शासन निर्णयानुसार, मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२५०५१६१७३४२४१७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR
MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=6ce40b982ce0fd403128e2717e7e0c7b7377fd69d7d2379
0cb110e33b1e0491e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E
1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2025.05.16 17:36:24 +05'30'

**(मुरलीधर मुंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) पोलीस अधीक्षक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-२ महाराष्ट्र, नागपूर.
५) कोषागार अधिकारी, नागपूर शहर.
६) उप कोषागार अधिकारी, नागपूर शहर.
७) कार्यासन अधिकारी (का-१४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९) सिनियर ॲडव्होकेट सिध्दार्थ दवे , ऑफीस-बी-५/२०६, ग्राउंड फ्लोअर ॲन्ड बेसमेंट, सफदरजंग एनक्लेव्ह, नवी दिल्ली-११० ०२९.
१०) निवड नस्ती (पोल-१०).